**चांदुरबाजार पंचायत समिती (जि. अमरावती) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१८/प्र.क्र.८३/बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीखः ४ सप्टेंबर, २०१८

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, ग्रा.वि.व ज.सं.वि.क्र.पंसई-२०१३/प्र.क्र.१९२/पंरा-७, दि. २६ ऑगस्ट, २०१४

२) कार्यकारी अभियंता (बांध) जिल्हा परिषद अमरावती यांचे पत्र क्र.जिप/बांध/तां/१८८४/२०१८, दि. २६.०३.२०१८ व पत्र क्र. क्र.जिप/बांध/तां/४९९५/२०१८, दि. २५.०६.२०१८

<u>प्रस्तावना :-</u>

१. कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, अमरावती यांनी वरील क्र.२ च्या पत्रान्वये चांदुरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचे प्रस्तावित केले आहे.

२. चांदुरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या रु. ३९३.१६ लक्ष किंमतीच्या सविस्तर अंदाजपत्रकास दिनांक २६.०८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर मान्यता ही सन २०१२-१३ च्या दरसूचीवर आधारीत होती. मुळ बांधकामाच्या मंजूर सलोह संकल्पनेनुसार (R.C.C. Raft Foundation) खोदकामापासून काँक्रीट कामापर्यंत वापरण्यात आलेल्या लोखंड कामामध्ये तसेच, पाया भरणीच्या उंचीमध्ये (Plinth Height) मध्ये वाढ झाल्यामुळे संबंधित बाबींच्या किंमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे, चांदुरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या खर्चात एकूण रु. ३९,३१,०००/- इतकी वाढ होत आहे. सदर वाढ मुळ बांधकामाच्या किंमतीत १० % इतकी आहे. चांदुरबाजार पंचायत समिती प्रशासकीय इमारतीचे मुळ बांधकाम ९५ % पुर्ण झालेले असून इतर अनुषंगीक बाबींची कामे शिल्लक आहेत. या कामी अमरावती जिल्हा परिषदेला प्रशासकीय मान्यतेएवढा पूर्ण निधी टप्प्या-टप्प्याने वितरीत करण्यात आला असून शिल्लक असलेली इतर अनुषंगीक बाबींची आवश्यक कामे या निधीमध्ये पुर्ण करता येणे शक्य नाही. त्यामुळे कार्यकारी अभियंता(बांध) जिल्हा परिषद, अमरावती यांनी संदर्भीय पत्रान्वये रु. ४३२.४७ लक्ष इतक्या रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

३. कार्यकारी अभियंता(बांध) जि.प., अमरावती यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती चांदुरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता रुपये ४३२.४७ लक्ष इतक्या रक्कमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

४. चांदुरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रुपये ३९३.१६ लक्ष रक्कमेमध्ये रुपये ३९.३१ लक्ष इतकी वाढ करुन रुपये ४,३२,४७,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी बत्तीस लक्ष सत्तेचाळीस हजार फक्त) इतक्या रक्कमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास, या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५. चांदुरबाजार पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या मुळ प्रशासकीय व सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकाचा तुलनात्मक गोषवारा खालील प्रमाणे आहे:-

पंचायत समिती चांदुरबाजार नवीन प्रशासकीय इमारतीच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा तुलनात्मक गोषवारा

| अ. क्र. | बाबीचा तपशिल | मुळ प्रशासकीय मान्यतेनुसार रक्कम (रु.) | सुधारीत प्रशासकीय मान्यता रक्कम (रु.) | बचत रक्कम (रु.) | अतिरिक्त रक्कम (रु.) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मुख्य स्थापत्य काम | ३०२४५०००.०० | ३८९६५०००.०० | ०.०० | ९६२००००.०० |
| २ | विद्युतीकरण | ३३२७०००.०० | १८०००००.०० | १५२७०००.०० | ०.०० |
| ३ | पाणी पुरवठा व मल:निस्सारण | २४२००००.०० | ३०००००.०० | २१२००००.०० | ०.०० |
| ४ | रेन वॉटर हार्वेस्टींग आणि फायर फायटींग | ३०००००.०० | ३०००००.०० | ०.०० | ०.०० |
| ५ | आकस्मिक खर्च | १२०९०००.०० | ९८२०००.०० | २२७०००.०० | ०.०० |
| ६ | दर वाढ | १८१५०००.०० | ०.०० | १८१५०००.०० | ०.०० |
| | एकूण | ३९३१६०००.०० | ४३२४७०००.०० | ५६८९०००.०० | ९६२००००.०० |
| | **एकूण अतिरिक्त (६-५) (%)** | | | | **३९३१०००.०० (१०%)** |
| | **रक्कम पुर्णांकात** | | | | **३९३१०००.००** |

६. उपरोक्त प्रशासकीय इमारत बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतरच सहायक अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने, उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे निधी वितरीत करण्यात येईल. या कामी वितरीत करण्यात आलेला रु. ३९३.१६ लक्ष निधी वजा जाता उर्वरीत रु. ३९.३१ लक्ष इतका निधी जिल्हा परिषदेला देय राहील.

७. चांदुरबाजार पंचायत समितीच्या कामाच्या किंमतीत पुन:श्च कोणतीही भाववाढ यापुढे देय होणार नाही. सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत सदर इमारतीचे बांधकाम मार्च-२०१९ अखेरपर्यंत नियोजनबध्द रित्या पूर्ण करुन व लेखे अंतिम करुन इमारत विनाविलंब वापरात आणण्यात यावी.

८. चांदुरबाजार पंचायत समिती प्रशासकीय इमारत बांधकामाच्या प्रगतीची माहिती शासनाने विकसीत केलेल्या कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर तात्काळ अद्यावत करण्यात यावी.

९. या कामावरील खर्च हा "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा.

१०. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र. १ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०९०११७२३२०३८२० हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

R A Nagargoje

Digitally signed by R A Nagargoje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, cn=R A Nagargoje
Date: 2018.09.04 12:22:30 +05'30'

(र.आ.नागरगोजे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. विरोधी पक्ष नेता विधानसभा/ विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर
३)महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४)मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती
५)अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती
६)मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती
७)कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद अमरावती
८)जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा अमरावती
९)मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१०)उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, अमरावती
११)जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, अमरावती
१२)सभापती, पंचायत समिती, चांदुरबाजार, जिल्हा अमरावती
१३)गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चांदुरबाजार, जिल्हा अमरावती
१४)निवड नस्ती कार्यासन बांधकाम-४, ग्रा.वि.व ज.सं.विभाग, बांधकाम भवन मुंबई